जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत मौजे सुधार कसबा सांगाव (ता. कागल, जि.कोल्हापूर ) नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु- २०२०/प्र.क्र. ५९/पापु-१७**
**७ वा मजला, गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल,**
**लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१**
**दिनांक : ११ सप्टेंबर, २०२०.**

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४
३) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६ फ़ेब्रुवारी, २०१५
४) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
५) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-२०१८/प्र.क्र.१७१/पापु-०७, दिनांक ११ फेब्रुवारी, २०१९.
६) शासन निर्णय क्रमांक जजमि-२०१९/प्र.क्र.१३८/पापु-१० (०७), दिनांक ०४ सप्टेंबर, २०२०.
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जाक्र/मुअ (पुणे)/ तांशा ३/कसबा सांगाव/तां.मं./२०२०, दिनांक २१ नोव्हेंबर, २०१९.
८) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्रमांक जाक्र/ मुअ (पुणे)/तांशा ३/कसबा सांगाव/२०२१, दिनांक २१ नोव्हेंबर, २०१९.

प्रस्तावना

मौजे सुधार कसबा सांगाव (ता.कागल, जि.कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेचा दरडोई खर्च हा विहीत निकषापेक्षा जास्त असल्यामुळे सदर नळ पाणी पुरवठा योजनेस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भ क्रमांक ०७ अन्वये शासनाच्या मान्यतेकरीता सादर केला आहे. प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भ क्रमांक ०८ च्या आदेशान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार मौजे कसबा सांगाव (ता.कागल, जि.कोल्हापूर ) नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मौजे सुधार कसबा सांगाव ( ता.कागल, जि.कोल्हापूर ) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ४८३६ (३ कि.मी. अंतरावरील खर्च वगळून) एवढया दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रुपये ११९९.७० लक्ष (ढोबळ) (अक्षरी रुपये अकरा कोटी नव्याण्णव लक्ष सत्तर हजार फक्त) इतक्या किमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास जल जीवन मिशन कार्यक्रमाअंतर्गत खालील अटी व शर्तींची पुर्तता करण्याच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फ़त करण्यात यावी. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर किमान १ वर्षे योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक राहील. योजना यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे याची खात्री महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने करावी, तसेच योजनेच्या देखभाल दुरुस्तीसाठी संदर्भाधीन क्र. ५ येथील दि.१७ ऑक्टोबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करावा.

२) संदर्भ क्रमांक १२ येथील दिनांक ११ फेब्रुवारी, २०१९ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीचा अवलंब करावा.

३) योजनेची अंमलबजावणी होऊन कंत्राटदारा मार्फत योजना किमान १ वर्ष चालविण्यात येणार असली तरी ग्रामस्थांकडून या एक वर्षाचीही पाणीपट्टी वसूल करण्यात यावी. वसूल करण्यात आलेली पाणीपट्टी योजना चालविणा-या संस्थेस देण्यात यावी.

४) **योजनेचे कार्यादेश देण्यापूर्वी जल जीवन मिशनच्या धोरणानुसार पाणी पुरवठयाच्या देखभाल दुरुस्तीपोटी योजनेच्या किंमतीच्या १० टक्के रक्कम लोकवर्गणीव्दारे ग्रामपंचायतीकडे ठेवणे आवश्यक राहील. त्यानंतरच कार्यादेश देण्यात यावेत.**

५) **सदर गावाचा जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनेनुसार काम सुरु करण्यापूर्वी गाव कृती आराखडा तयार करणे आवश्यक आहे.**

६) सदर योजनेतून प्रत्येक घरास नळ जोडणी देणे आवश्यक आहे. याद्दष्टीने आतापर्यंत दिलेल्या नळ जोडणी व पूढे देण्याच्या नळ जोडणीबाबत IMIS वर माहिती नोंदविणे आवश्यक आहे. नवीन जोडणीबाबत आवश्यक ते नियोजन करण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.

७) योजनेची कामे विहीत पध्दतीने ई- निविदा मागविण्यात येऊन करावीत.

८) योजनेसाठी आवश्यक भुसंपादन व इतर सर्व परवानग्या प्राप्त करण्याकरिता जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात यावी. सदर समिती रेल्वे/रस्ते/वन जमिनीची क्रॉसींग व भुसंपादनाचा प्रत्येक महिन्याला आढावा घेईल.

९) योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळ जोडण्यांचा व मीटरचा समावेश करण्यात यावा. तसेच किमान ८० % नळजोडणी धारकाकडून स्वखर्चाने मीटर जोडणी घेणेबाबत हमीपत्र घेण्यात यावे व त्याची एक प्रत लॅमिनेट करुन नळ जोडणी धारकास द्यावी व एक प्रत ग्रामपंचायतीकडे ठेवण्यात यावी.

१०) सदर योजनेचा वापर हंगामी स्वरुपात होऊ नये याकरिता योजनेत समाविष्ट गावातील अस्तित्वातील योजना चालविण्यात येऊ नयेत.

११) योजना चालविणे व देखभाल दुरूस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार घरगुती, बिगर घरगुती व संस्थात्मक नळजोडणी धारकासाठी पाणी पट्टीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी.

१२) वसूल करण्यात आलेल्या पाणीपट्टीपैकी २० टक्के पाणीपट्टी ही मोठ्या देखभाल दुरुस्तीकरिता योजना राबविणाऱ्या संस्थेकडे ठेवण्यात यावेत. योजनेच्या पाईप्स या उपांगाची देखभाल दुरुस्ती प्रत्येक ५ वर्षांनी व इतर उपांगाची देखभाल दुरुस्ती प्रत्येक ३ वर्षानी करावी.

१३) योजना चालविणे त्याचे परिरक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस / जिल्हा परिषदेस / महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

१४) सदर योजनेतील सर्व गावे हागणदारी मुक्त असले तरी ते नेहमीच हागणदारी मुक्त राहतील याबाबत खात्री करावी.

१५) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ होत असल्यास शासनाकडून पुर्व परवानगीशिवाय जादा अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

१६) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच संदर्भाधीन क्र. १ व ४ येथील शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

१७) संदर्भाधीन क्र.९ येथील दि.१५ जून, २०१५ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार योजनेचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे अनिवार्य राहील.

१८) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरूवात करावी.

१९) योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने योजना पुर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिका-याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

२०) योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

२१) **राष्ट्रीय जल जीवन मिशन अंतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा योजनांकरिता विहित केलेली मानके पूर्ण करणे बंधनकारक राहील.**

२२) योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), बेलापूर यांची राहील.

२. या योजनेवर होणारा खर्च मागणी क्र. वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, जल जीवन मिशन कार्यक्रम (राज्य हिस्सा) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) ( २२१५ ९७९१) (२२१५ A०९७) (२२१५ A०६१), जल जीवन मिशन कार्यक्रम (राज्य हिस्सा) (२२१५ २०७१), तसेच राज्या हिश्याकरीता ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ९७९१) (२२१५ A०८८) (२२१५ ९८५३) (२२१५ ९९८९) या लेखाशिर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१११४४१४२०९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Adhikrao
Bapu
Budhe

Digitally signed by Adhikrao Bapu Budhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9b3afc989167fcd7f4487809755a2a08c37958a70b01ce9dd6139bffb1e6896, serialNumber=6dd8309934e3a186f9e32ab2ed268a322fa2805ecbd838d076066aa8f4668bc0, cn=Adhikrao Bapu Budhe
Date: 2020.09.11 15:35:15 +05'30'

**( अ.बा.बुधे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.सभापती / उपसभापती, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
२. मा.अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
६. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
७. महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
८. विभागीय आयुक्त, पुणे विभाग,
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
११. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, कोल्हापूर.
१३. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,सिडको भवन,बेलापूर
१४. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, पुणे.
१५. जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, कोल्हापूर.
१६. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मंडळ सांगली.
१७. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, कोल्हापूर.
१८. कार्यकारी अभियंता ,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर.
१९. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२०. मुख्य अभियंता तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
१९. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासन क्र. १,४,५,६,१०,१३,१८ व १९.
२०. निवडनस्ती पापु-१७, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.